

## राणीची बाग

स्वप्नात पाहिली
राणीची बाग;
हत्तीच्या पाठीवर
बसला नाग.

हरणांच्या बरोबर
खेळत पत्ते
बसले होते
दोन चित्ते.



माकड होते
सांगत पुराण;
उंट होता
वाचीत कुराण.

सिंह होता
व्याख्यान देत;
गाढव होते
उतरून घेत.



जिराफ होता
गात छान :
मानेइतकीच
लांब तान.



कोल्हा होता
दुकानदार;
त्याच्या दुधात
पाणी फार.

मला पाहाताच
म्हणाले सारे,
"एक पिंजरा
याला द्यारे."



त्याबरोबर
आली जाग;
स्वप्नात पाहिली
राणीची बाग.



## आटपाट नगरामध्ये

आटपाट नगरामध्ये
नाही होत चोरी;
हुशार मुले काळी; आणि
खुळी मुले गोरी.



आटपाट नगरामध्ये
किती किती मजा !
प्रधान भरतो पाणी; आणि
रस्ते झाडतो राजा.

आटपाट नगरामध्ये
नाही चालत नाणी;
एक शेर गुळासाठी
दहा-बारा गाणी !

आटपाट नगरामध्ये
सुटी नाही, बाळा,
सांग कशी सुटी असेल,
जर नाही शाळा?

## मावशी

सोलापूरहून
येते काकू;
माझ्यासाठी
आणते चाकू.

कोल्हापूरहून
येते आत्ते;
माझ्यासाठी
आणते पत्ते.

राजापूरहून
मावशी येते;
माझा एक
पाप्पा घेते !



## परी ग परी

'परी ग परी
कोण तुझ्या घरीं?'
''मनी मांजरी स्वैपाक करी''

'परी ग परी
कोण तुझ्या घरीं?'
''उंदीर खातो श्रीखंड-पुरी.''

'परी ग परी
कोण तुझ्या घरीं?'
''पोपट म्हणतो, 'हरी, हरी'.''

'परी ग परी
येऊ का घरीं?''
''दारांत विंचू पहारा करी!''



## टोक न मोडण्याचा मंत्र

तीन साले शाळेची;
तीन साले वेळेची;

तीन साले चाकूची;
तीन साले डाकूची.

तीन चोक तेरा,
एक चाकू मारा.

डाकू, डाकू, डाकू,
धारवाला चाकू;

पोलादाचे पान;
टोक झाली छान.





## कावळ्याचे बेत

कावळ्याने केले
आपले लगीन;
हुंडा मिळाला
रुपये तीन.

एका रुपयाचे
आणलेन् कापड;
एका रुपयाचे
घेतलेन् पापड.

आणि म्हणाला,
''जमले तर
एका रुपयात
बांधीन घर !''



## बेडूक नावाचा विद्यार्थी

एक मुलगा गेला
तळ्याच्या काठीं;
विसरला पुस्तक,
विसरला पाटी.

तळ्यात होता बेडूक
त्याने पोशाख केला;
पाटी-पुस्तक घेऊन
शाळेमध्ये गेला.



मास्तरांनी घातली
तोंडात बोटे:
एवढ्याशा पोराचे
डोके किती मोठे!

तालीममास्तर म्हणाले,
''भलतीच तयारी!
पोहण्यामध्ये आहे
सगळ्यांनाच भारी.''

संस्कृतच्या मास्तरांचा
तास झाला सुरू;
बेडूक लागला मधेमधे
डराव्-डुरुक् करू.

वर्गात होती मुले
कमीत कमी शंभर;
पण बेडकाचाच आला
पहिला नंबर.

## माकडाचे दुकान

एका माकडाने
काढले दुकान;
आली गिऱ्हाइके
छान, छान.

मनीने आणले
पैसे नवे,
म्हणाली, ''शेटजी,
उंदीर हवे.''

गरुड म्हणाला
घेऊन झाप,
''दोन रुपयाचे
काढा साप.''

अस्वल आले
नाचवीत पाय,
म्हणालें, ''मधाचा
भाव काय?''

कोल्ह्याने मागितला
गुळाचा रवा;
आणि म्हणाला,
''मांडून ठेवा!''

माकड म्हणाले
लावून गंध,
''आता झाले
दुकान बंद.''



## चार शहाणे





माकडाने घातली
छत्रीएवढी हॅट;
म्हणाले, ''मी हॉलंडचा
डॉक्टर व्हॉन वॅट.''

कोल्होबाने घातली
पगडी लालेलाल;
म्हणाला, ''मी काशीचा
पंडित बन्सीलाल.''

लांडग्याने चढवली
गोंडेवाली फेझ;
म्हणाला, ''मी मक्केचा
शेख इमाम बेझ.''



चिंचेवरच्या घुबडाने
त्यांचा ओढला पाय;
म्हणाले,''पण शेपट्यांचे
करणार काय?''



## भीमाचे जेवण

बकासुर ओरडला,
'अलल् डुर्र';
भीमाने मारला
भुरका... 'भुर्र'

बकासुराने
मारली थप्पड,
भीम म्हणाला,
"लोणचे फक्कड!"

बकासुरानें
हाणला ठोसा;
भीम म्हणाला,
"इडली-दोसा."

बकासुराने
बुकलली मान;
भीम म्हणाला,
"चटणी छान!"



बकासुराने
हाणली ठोकर;
भीमानें दिली
एक ढेकर !

बकासुराने
मारली गदा;
भीम हसला
खदा खदा !

बकासुराला
घाम फुटला;
तेव्हा भीम
जेवून उठला.



## चिमण्ये, तुझे वजन किती?

चिमण्ये, तुझे वजन किती?
"चार माणके, चाळीस मोती."

कोंबड्या, तुऱ्याची किंमत काय ?
"दोन हात, दोन पाय."

कावळ्या, तुझे आजोळ कुठे ?
जिथे मिळतात तीन तिठे."

मोरा, नाच शिकलास कसा?
"असा; असा; असा; असा."



## मैफल

एक झुरळ
रेडिओत गेले;
गवयी होऊन
बाहेर आले.

एक उंदीर
तबल्यात दडला;
तबलजी होऊन
बाहेर पडला.

त्या दोघांचे
गाणे झाले
तिकीट काढून
मांजर आले!

## भोवऱ्याचे गाणे

भिरभिर भोवऱ्या
भीर भीर,
एका पायावर
फीर फीर.

गुंगुन गुंगुन
गाणे म्हण;
नको हालू
एक कण.

सात दिवस
फिरत राहा;
सात देश
इथून पाहा.

भिरभिर भोवऱ्या
भीर भीर,
भोवळ आली तर
पाजीन खीर!





## पतंग आणि ठेंगू

एकदां एका मुलाचा
पतंग गुल् झाला;
ठेंगूंच्या देशामध्यें
उडत उडत गेला.

ठेंगूंच्या देशामधला
आंगठ्याएवढा पोर;
त्यानें मांजा पकडला
लावून सगळा जोर.

ठेंगूंच्या देशामध्यें
चमत्कार झाला :
पतंगाच्या बरोबर
ठेंगू उडून गेला !



## जादूचे जंगल

आफ्रिकेच्या जंगलामध्ये
नाचणारे झाड !
माडाएवढी तुळस
आणि तुळशीएवढे माड.

तुळशीएवढ्या माडावर
मांजराएवढी खार;
तिच्या मऊ पाठीवरती
ठेंगू होतो स्वार.

ठेंगू खातो खोबरे
आणि खार पिते पाणी;
आफ्रिकेच्या जंगलामध्ये
झाडे म्हणतात गाणी !

## कुंभकर्ण

कुंभकर्णाला
झोप आली;
डोंगर घेतलान्
उशाखाली.

वादळांनी त्याला
घातला वारा
तरी घामाच्या
सुटल्या धारा.

त्यातून निघाले
नदी-नाले;
— किती लोक
बुडून मेले !

रावणाने डागली
नाकात तोफ;
तेव्हा उडाली
त्याची झोप.

कुंभकर्ण म्हणाला,
"बहार झाली !
स्वप्नात पुन्हा
झोपच आली !"



## दीपावळ

### परीची करामत

अनाराच्या झाडावर
एक परी चढली;
सात वेळा पडली;
तरी नाय रडली.

तिचे सगळ्या परींनी
कौतुक केले फार.
फुलबाजांच्या फुलांचा
गळ्यात घातला हार.

## लाडवांचा किल्ला

दिवाळीत आम्ही बांधला
लाडवांचा किल्ला;
रात्री त्यावर केला
कुणी तरी हल्ला.

सगळे लोक म्हणाले,
''मुले सांगतात खोटे.''
पण भलंभटाचे पोट
झाले दुप्पट मोठे

## चिक्कणकाकूच्या करंज्या

दिवाळीतल्या करंज्या
शिमग्याच्या साठी
चिक्कणकाकूने ठेवल्या
देव्हाऱ्याच्या पाठी.

पण त्या करंज्यांच्या
चिमण्या झाल्या छान;
डबा उघडून गेल्या
शोधित माथेरान.





## शिंदेशाही विनोद

शिंदेकाका आणतात
एव्वढा खाऊचा पुडा;
आणि मग शिंकतात
धडा, धडा, धडा.

काकांच्या शिंकण्याला
मुळी नाही ताळ,
म्हणतात, ''माझ्या नाकात
आहे फटाक्याची माळ !''

## पणत्या

पणती लावा
पुढच्या दारा;
पाव्हणा येईल;
गोरा, गोरा !

पणती लावा
मागच्या दारी;
नाही होणार
कधी चोरी.

पणती लावा
तुळशीपाशी;
धनधान्याच्या
पडतील राशी.

पणती लावा
खिडकीमधेच;
नाहीतर मनीला
लागेल ठेच.

अंगणात लावा
पणत्या साठ;
वाटसरूंना
दिसेल वाट !



## विंदा करंदीकर यांच्या बालकविता संचातील पुस्तके

राणीची बाग
सशाचे कान
एकदा काय झाले !
परी ग परी
एटू लोकांचा देश
सर्कसवाला
टॉप
सात एके सात
बागुलबोवा
पिशी मावशी आणि तिची भुतावळ
अडम् तडम् (परचुरे प्रकाशन)

RANICHI BAUG
(Poetry for children)
Vinda Karandikar

राणीची बाग
(म-८२)
पॉप्युलर प्रकाशन
ISBN 81-7185-419-2



पहिली आवृत्ती : १९६१/१८८३
दुसरी आवृत्ती : १९७५/१८९७
तिसरी आवृत्ती : १९९३/१९१५
पुनर्मुद्रण : २००३/१९१५

चित्रे आणि सजावट : वसंत सरवटे

प्रकाशक
रामदास भटकळ
पॉप्युलर प्रकाशन प्रा. लि.
३५ सी, पं. मालवीय मार्ग
ताडदेव, मुंबई ४०० ०३४

मुद्रक
साई प्रिंटर्स
१६/बी, माटकर मार्ग
न्यू म्युन्सिपल मार्ग
एल्फिन्स्टन, मुंबई ४०० ०२५

**किंमत : रु. ३०.००**



# राणीची बाग

**कवी : विंदा करंदीकर**
**चित्रकार : वसंत सरवटे**





**पॉप्युलर प्रकाशन, मुंबई**